**सन २०२२ -२३ या आर्थिक वर्षाकरिता विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) लेखाशिर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२२/प्र.क्र.६०/फ-११**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १४.०३.२०२३.

**वाचा:-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे दि.१३.०९.२०२२ रोजीचे पत्र.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दि.०२.०९.२०२२ रोजीचे पत्र.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२२/प्र.क्र.६०/फ-११, दि. २०.०९.२०२२.
५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२२/प्र.क्र.६०/फ-११, दि. २२.११.२०२२.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.साववि-२०२२/प्र.क्र.६०/फ-११, दि. ०३.०१.२०२३.
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क.४३/अर्थ-३, दि.०८.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, दिनांक ६.०३.२०१७ अन्वये राज्यातील राष्ट्रीय हरित सेना हा कार्यक्रम अस्तित्वात असलेल्या ८८०७ शाळांमध्ये विद्यार्थी हरित सेना ही नविन योजना राबविण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. राज्यातील सर्व जिल्ह्यातील प्रती शाळा रू. २५००/- प्रमाणे ८८०७ शाळांसाठी विद्यार्थी हरित सेना या योजनेंतर्गत सन २०१६-१७ पासून इकोक्लब असलेल्या शाळांना राज्यामार्फत अनुदान उपलब्ध करून देण्यात येते.

२. विद्यार्थ्यांना पर्यावरणाच्या समस्येबाबत तसेच सद्यस्थितीबाबत विविध उपक्रमांद्वारे अद्ययावत माहिती देणे, पर्यावरण संरक्षणाच्या व संवर्धनाच्या प्रत्यक्ष कामांमध्ये त्यांना सहभागी करून घेणे आणि त्यांच्या माध्यमातून जन सामान्यांमध्ये जनजागृती करणे, ही या योजनेची मुख्य उद्दिष्ट्ये आहेत. सन २०२२-२३ साठी सदर योजनेसाठी रू.२५०.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. वित्त विभागाने रु. १७५.०० लक्ष इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजास मान्यता प्रदान केली आहे. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सन २०२२-२३ करिता सदर योजनेंतर्गत एकूण ८८०७ शाळांमधील इको क्लब साठी प्रत्येकी रू.२५००/- याप्रमाणे रू.२२०.१७५ लक्ष इतक्या निधीची आवश्यकता असल्याचे संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये शासनास कळविले आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ४, ५ व ६ येथील दि. २०.०९.२०२२, दि. २२.११.२०२२ व दि. ०३.०१.२०२३ रोजीच्या शासन निर्णयांन्वये सदर योजनेंतर्गत अद्यापर्यंत एकूण रु.१०५.०० लक्ष निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ चे परिपत्रकान्वये, वित्तीय वर्ष २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय तरतुदींची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२२-२३ च्या प्रथम नऊमाहीकरिता (डिसेंबर, २०२२ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ६०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरित करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत. सद्यस्थितीत वित्त विभागामार्फत सदर योजनेंतर्गत रु.१७५.०० लक्ष निधी बीम्सप्रणालीवर वितरीत करण्यात आलेला आहे. त्यामुळे सदर योजनेंतर्गत उर्वरित रु.७० लक्ष निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात वन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विद्यार्थी हरित सेना (२४०६ A१९४) योजनेकरिता रु.२५०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आलेला होता व रु.१७५.०० लक्ष इतक्या सुधारित अंदाजास वित्त विभागाद्वारे मान्यता देण्यात आली आहे. त्यापैकी रू. ७०.०० लक्ष निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२२-२३ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळता केला नसल्याची खात्री करावी.

४. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व ७ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**

**२४०६, वनीकरण व वन्यजीवन**

**(००३) शिक्षण व प्रशिक्षण (००) (०४) विद्यार्थी हरित सेना(२४०६ A१९४)**

**५०-इतर खर्च**

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दि.०४.०४.२०२२ व दि. ०८.०२.२०२३ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१४१२५३५९२६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK
BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.03.14 12:59:49 +05'30'

**(विनायक बा. इंगळे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)

५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त)

६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)

७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)

८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर.

९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.

११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई

१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२

१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१५. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१६. निवडनस्ती फ-११.